महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील २२१० जी २८९ या लेखाशिर्षाखालील निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०१९/प्र.क्र.२०५/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: २५ फेब्रुवारी, २०२०.

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २१ सप्टेंबर, २०१८.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०१९
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९.
५) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्रमांक:बीयुडी-२०१९/प्र.क्र.०५/कार्या-०६, दिनांक १९.०९.२०१९.
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१९/प्र.क्र.१४९/आरोग्य-६, दिनांक २३.०९.२०१९.
७) वित्तीय सल्लागार, राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचे पत्र जा.क्र. राआहसो/लेखा/प्र.अ./ निधी वितरण/५४२६-ब/१२४६/२०१९, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१९.
८) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.२२.०१.२०२०.
९) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मफुयो-२०१८/प्र.क्र.३०३/आरोग्य-६, दिनांक ३१ जानेवारी, २०२०.
१०) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्रमांक:बीयुडी-२०१९/प्र.क्र.०५/कार्या-०६, दिनांक ३१.०१.२०२०.

**प्रस्तावना :-**

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी आदिवासी उप योजनेंतर्गत २२१० जी २८९ (TSP), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली रू.१५,००,००,०००/- (अक्षरी रूपये पंधरा कोटी फक्त) इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे. सदर निधीपैकी संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन निर्णयान्वये रू. ९,००,००,०००/-

(अक्षरी रूपये नऊ कोटी) महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अमंलबजावणीसाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्यात आलेला आहे. आदिवासी विकास विभागाने संदर्भाधीन क्र. १० येथील शासन निर्णयान्वये आदिवासी उप योजनेंतर्गत (२२१० जी २८९) या लेखाशिर्षाखालील उर्वरीत निधी रुपये ६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सहा कोटी फक्त) या विभागास वितरित केला आहे. सदर निधी महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत लाभार्थी कुटुंबाचा विमाहप्ता अदा करणे, तसेच योजनेवरील अन्य प्रशासकीय खर्च भागविणे, यासाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रूपये ६,००,००,०००/- (अक्षरी रूपये सहा कोटी फक्त) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रक्कमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

मागणी क्रं. टी-०५
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३ - ग्रामीण आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना
(०१)- जनजाती क्षेत्र उप योजनांतर्गत योजना
(०१)(०६) - महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (राज्य योजना)(टीएसपी)
२२१० जी २८९ (दत्तमत) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)

२. सदर निधी सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. आदिवासी उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना आदिवासी विकास विभागाच्या दिनांक ३१.०१.२०२० च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

४. वित्त विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांचे सर्व संबंधितानी काटेकोरपणे पालन करावे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमुद अटींची पुर्तता झाली आहे.

५. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाने दिनांक ३१.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या सहमतीस व वित्त विभागाच्या दिनांक ०८.०७.२०१९ च्या शासन परिपत्रकातील प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२२५१४५२४७७३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2020.02.25 16:57:45 +05'30'

(सु.नि. गाडगे)

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई (३प्रती).
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६),मंत्रालय,मुंबई.
११.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती.